अर्थसंकल्पीय अंदाज सन २०१९-२०
आणि सुधारित अंदाज सन २०१८-१९.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.५८/अर्थसंकल्प-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ०७ डिसेंबर, २०१८.

**संदर्भ :-**

**शासन परिपत्रक, वित्त विभाग, समक्रमांक दिनांक ०६.१०.२०१८.**

**परिपत्रक :-**

संदर्भाधीन दिनांक ०६.१०.२०१८ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाज सन २०१९-२० आणि सुधारीत अंदाज सन २०१८-१९ याबाबतची माहिती मागविलेली आहे. सदर परिपत्रकामध्ये प्रचलित पध्दतीनुसार विधानमंडळाला अर्थसंकल्प सादर होईल असे गृहित धरुन त्यानुसार अर्थसंकल्पीय अंदाज व सुधारीत अंदाज वित्त विभागास पाठविण्याच्या तारखा निश्चित करण्यात आल्या आहेत. तथापि, आगामी अर्थसंकल्पीय अधिवेशन नेहमीपेक्षा लवकर म्हणजेच दिनांक १८.०२.२०१९ रोजी सुरु होणार आहे. त्यामुळे राज्याचा पुढील वर्षाचा अर्थसंकल्प व सन २०१८-१९ मधील तृतीय पुरवणी मागण्या सादर करण्यासाठी आवश्यक ती तयारी वित्त विभागाला करण्यासाठी प्रशासकीय विभागांकडून अर्थसंकल्प अंदाज व सुधारीत अंदाज खालील दिनांकापर्यंत मागविण्यात येत आहेत.

दिनांक २० डिसेंबर, २०१८ - अनिवार्य खर्चाचे अर्थसंकल्पीय अंदाज सन २०१९-२०२०
दिनांक ०५ जानेवारी, २०१९ - अनिवार्य व कार्यक्रम खर्चाचे आठमाही सुधारीत अंदाज सन २०१८-२०१९

२. प्रचलित पध्दतीने उपरोक्त अंदाज विहित कालमर्यादेत पाठविण्यात यावेत. तसेच वित्त विभागाकडे सदर अंदाज सॉफ्ट कॉपी स्वरुपात पाठविण्यासाठी बिम्सवर नवीन प्रणाली विकसित केलेली आहे. सदर प्रणालीवर ऑनलाईन पध्दतीने याबाबतची माहिती वरील दिनांकापर्यंत न चुकता वित्त विभागास सादर करणे अनिवार्य आहे. उपरोक्त प्रणालीवर विभागस्तरावर मान्य केलेली माहिती भरण्याची व भरलेल्या माहितीची प्रिंट काढून ती वित्त विभागास सादर करण्याची कार्यपध्दती सोबतच्या प्रपत्रामध्ये देण्यात आलेली आहे.

३. विधानमंडळामध्ये अर्थसंकल्प सादर करणे ही वित्त विभागाची संविधानिक जबाबदारी असल्याने सर्व संबंधित विभागांनी उपरोक्त वेळापत्रकानुसार आवश्यक ती माहिती सादर करणे बंधनकारक आहे. सदर सूचनांचे पालन न झाल्यास त्याबाबतची सर्वस्वी जबाबदारी संबंधित विभागाची राहील याची दक्षता घेऊन त्यानुसार कार्यवाही करावी.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१०११०४१५३७०५ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Harishchandra Patil

Digitally signed by Sanjay Harishchandra Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=97dfaec63bf6708ef28d3addf75c3f4a339b56cd7ad3e760d73f1899cb3091a8, serialNumber=3ef68d6e0c55da3e134d6ee9ae1071ca30ca95bfc70f94316408345ba20817c5, cn=Sanjay Harishchandra Patil
Date: 2018.12.10 11:11:56 +05'30'

**( सं. ह. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
२. सर्व सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग,
३. महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
४. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. निवड नस्ती, अर्थसंकल्प-१, वित्त विभाग.

## प्रपत्र

सर्व संबंधित प्रशासकीय विभागाच्या अर्थसंकल्प शाखांनी BEAMS प्रणालीच्या LIVE MODE वर अर्थसंकल्पीय अंदाज (अनिवार्य) व सुधारीत अंदाज (अनिवार्य व कार्यक्रम) तसेच जमा रकमा यांचे अर्थसंकल्पीय अंदाज व सुधारीत अंदाज यांची माहिती नोंदविणे आवश्यक आहे. त्यासाठी संबंधित विभागाच्या अर्थसंकल्प शाखांनी प्रथमत: BEAMS प्रणालीच्या LIVE MODE वरील DRAFT MODE मध्ये ESTIMATE वर नमूद खर्चाचे / जमेचे अर्थसंकल्पीय / सुधारीत अंदाजांचा मजकूर अचूक नोंदवावा. सदर माहिती तपासून व ती APPROVE करुन FINAL MODE ला पाठवावी. तद्नंतर सुधारणा असल्यास आवश्यक त्या सुधारणेसह FINAL MODE ला APPROVE करुन ती वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित कार्यासनाकडे FORWARD करावी. तत्पूर्वी याबाबतच्या माहितीची प्रत काढावी व सदर माहिती ज्या प्रचलित पध्दतीने विभागाच्या मान्यतेसह प्रस्ताव पाठवितात त्या प्रस्तावासोबत वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित कार्यासनाकडे विहित मुदतीत पाठविणे आवश्यक आहे. ही माहिती अचूक लेखाशिर्षामध्ये उद्दिष्टनिहाय भरणे आवश्यक आहे. नमुन्यादाखल माहितीचा मसुदा खालीलप्रमाणे आहे.

Department : A - GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT    User : adminA - ADMINISTRATOR    Fri,Dec 7,2018    DRAFT

Estimate | Fund Transfer | Budget Estimate | Loan | Reports | Maintenance | Sign out

**Budget Estimation from ( 2019-20 )**

Demand No :A-03    Major Head :2051-PUBLIC SERVICE COMMISSIONS    Back

Scheme :20510022-102-2-DEPARTMENTAL EXAMMINATIONS    Amount in Thousands

| Object Code | Object Description | Actuals | | | Budget | Supplementary1 | Supplementary2 | Total | Reappropriation | Expenditure | | Budget 2019-20 | Status |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | 2015-2016 | 2016-2017 | 2017-2018 | 2018-2019 | 2018-2019 | 2018-2019 | 2018-2019 | 2018-2019 | As Per BDS | AG | | |
| 13 | OFFICE EXPENSES | 0 | 0 | 0 | 345.000 | 0.000 | 0.000 | 345.000 | 0.000 | 0.000 | 0 | ₹ | Edit |
| 28 | PROFESSIONAL SERVICES | 0 | 0 | 0 | 2283.000 | 0.000 | 0.000 | 2283.000 | 0.000 | 0.000 | 0 | ₹ | Edit |
| | Total | 0 | 0 | 0 | 2628.000 | 0.000 | 0.000 | 2628.000 | 0.000 | 0.000 | 0 | | |

Add Object    Select Object Code    Add Object

View Draft    Reset    Cancel

Copyright © 2013-2014 Site Designed and Developed by National Informatics Center, Pune    For Regionwise Contact Please click on Helpdesk devbeam.beams@mahakosh.in

Department : A - GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT    User : adminA - ADMINISTRATOR    Fri,Dec 7,2018    DRAFT

Estimate | Fund Transfer | Budget Estimate | Loan | Reports | Maintenance | Sign out

**Revised Estimation from 2018-2019**

Demand No :A-04    Major Head :2052-SECRETARIAT -GENERAL SERVICES    Back

Scheme :20520034-090.2-MINISTER,S PERSONAL STAFF    Amount in Thousands

| Object Code | Object Description | Budget | Supplementary1 | Supplementary2 | Reappropriation | Total | Expenditure | | Revised Estimate | Status |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | 2018-2019 | 2018-2019 | 2018-2019 | 2018-2019 | 2018-2019 | As Per BDS | AG | | |
| 01 | SALARIES | 400000.000 | 0.000 | 0.000 | 0.000 | 400000.000 | 0.000 | 0 | ₹ | Edit |
| 06 | TELEPHONE ELECTRICITY AND WATER CHARGES | 1500.000 | 0.000 | 0.000 | 0.000 | 1500.000 | 0.000 | 0 | ₹ | Edit |
| 11 | DOMESTIC TRAVEL EXPENSES | 9000.000 | 0.000 | 0.000 | 0.000 | 9000.000 | 0.000 | 0 | ₹ | Edit |
| 12 | FOREIGN TRAVEL EXPENSES | 1000.000 | 0.000 | 0.000 | 0.000 | 1000.000 | 0.000 | 0 | ₹ | Edit |
| 13 | OFFICE EXPENSES | 8476.000 | 0.000 | 0.000 | 0.000 | 8476.000 | 0.000 | 0 | ₹ | Edit |
| 17 | COMPUTER EXPENSES | 1685.000 | 0.000 | 0.000 | 0.000 | 1685.000 | 0.000 | 0 | ₹ | Edit |
| | Total | 421661.000 | 0.000 | 0.000 | 0.000 | 421661.000 | 0.000 | 0 | | |

Add Object    Select Object Code    Add Object

View Draft    Reset    Cancel

Copyright © 2013-2014 Site Designed and Developed by National Informatics Center, Pune    For Regionwise Contact Please click on Helpdesk devbeam.beams@mahakosh.in

२.  या कार्यवाहीमध्ये काही तांत्रिक अडचण उद्भवल्यास संबंधित प्रशासकीय विभागांनी तातडीने वित्त विभागाच्या अर्थसंकल्प शाखेतील संबंधित कार्यासनाकडे किंवा अर्थ-४ या कार्यासनाकडे तात्काळ संपर्क साधावा.

** *** *** *** **